नागपूर येथे विधीमंडळाच्या हिवाळी
अधिवेशनाच्या कामासाठी जाणा-या
कर्मचा-यांना वाढीव दराने दैनिक
भत्ता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक : प्रवास-१०९१/प्र.क्र.२९९/सेवा-५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १३.१२.१९९१

पहा :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : आरपीएस-१२८८/५६८/सेवा-१०, दिनांक ३ ऑक्टोबर, १९८८.

शासन निर्णय :-

नागपूर येथे विधीमंडळाच्या हिवाळी अधिवेशनाच्या कामकाजासाठी जाणा-या कर्मचा-यांना वाढीव दराने दैनिक भत्ता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासन आता असे आदेश देत आहे की, दिनांक २ डिसेंबर, १९९१ पासून नागपूर येथे भरलेल्या विधीमंडळाच्या हिवाळी अधिवेशनासाठी विभागीय शिबिर कार्यालय उघडण्यात येणा-या दिनांकापासून ते कार्यालय बंद होईपर्यंतच्या कालावधीत अधिवेशनाच्या कामानिमित्त नागपूर येथे जाणा-या सर्व अधिकारी आणि कर्मचारी यांना खालीलप्रमाणे वाढीव दराने दैनिक भत्ता मंजूर करण्यात यावा.

| श्रेणी | वेतन मर्यादा | १९९१ च्या नागपूर अधिवेशनातील काळात दैनिक भत्त्याचा दर [प्रति दिन] |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| प्रथम श्रेणी | ५१०० व त्याहून अधिक | ७० |
| | ३००० - ५०९९ | ६५ |
| द्वितीय श्रेणी | २८०० - २९९९ | ६५ |
| | १९०० - २७९९ | ५० |
| | १७०० - १८९९ | ४० |
| तृतीय श्रेणी | १४०० पेक्षा कमी | ३५ |

या आदेशानुसार वाढीव दराने दैनिक भत्ता प्रदान करण्यासाठी होणारा खर्च संबंधित विभागानी आपआपल्या मंजूर अनुदानातून भागवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[मंगला मं. कोरगांवकर],
उप सचिव, वित्त विभाग.

प्रत :-

१] महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र-१, मुंबई,
२] महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र-२, नागपूर,
३] महालेखापाल-१ [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, मुंबई,
४] महालेखापाल-२ [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, नागपूर,
५] लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई,
६] निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
७] राज्यपालांचे सचिव,
८] मुख्यमंत्र्यांचे सचिव,
९] सर्व मंत्र्यांचे व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
१०] मंत्रालयातील सर्व विभाग,
११] सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
[शिबीर कार्यालय, नागपूर],
१२] सर्व विभागीय आयुक्त,
१३] सर्व जिल्हाधिकारी,
१४] वित्त विभागातील सर्व कार्यासने,
१५] सर्व कोषागार अधिकारी,
१६] निवड नस्ती, सेवा-५.